शासकीय अधिका-यास वयाच्या ५०/५५ वर्षापलिकडे सेवेत राहू देण्यासंबंधी करावयाचे पुनर्विलोकन...
विशेष पुनर्विलोकन समित्यांची पुनर्रचना

---

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक: विपुस १०९६/प्र.क्र.१२८/९६/१५.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: २९ नोव्हेंबर, १९९६.

पहा:- १] शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र. एसआरव्ही १०६९/डी, दिनांक १७.१०.१९६९.

२] शासन परिपत्रक, सा.प्र.वि. क्र. एसआरव्ही १०६९/डी, दि. २१.११.१९६९,

३] शासन परिपत्रक, सा.प्र.वि. क्र. एसआरव्ही १०७०/डी, दि. १४.९.१९७०,

४] शासन परिपत्रक क्र. विपुस १०९१/विपुस [ २ ] पुनर्रचना/प्र.क्र.१७/१५, दि. ३१.७.१९९१.

५] शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र. विपुस १०८६/८७/१५, दिनांक १९.३.१९९४.

६] शासन परिपत्रक, क्र. विपुस १०९४/[प्र.क्र.४५/९४]/१५, दि. ३०.९.१९९४.

शासन निर्णय :-
===========

महाराष्ट्र नागरी सेवा [ निवृत्ती वेतन] नियम १९८२ च्या नियम १०[४] व ६५अनुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम/संशयास्पद सचोटीच्या राज्य शासकीय अधिका-यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्याचे अधिकार समुचित प्राधिका-यांना [नियुक्ती प्राधिका-यांना] आहेत. त्यादृष्टीने शासन परिपत्रक, सा.प्र.वि. क्र. एसआरसी १०८५/१०२९/४३/१५, दि. १२.५.१९८६ अन्वये शासकीय अधिका-यांची सेवेत राहण्याची पात्रापात्रता अजमाविण्याचे निकष विहित करण्यात आले आहेत. या तरतुदींच्या आधारे शासनाच्या सेवतील गट अ आणि ब च्या राजपत्रित अधिका-यांची वयाच्या ५०/५५ वर्षापलिकडे किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण होणे, यापैकी जे अगोदर घडेल अशा उपरोक्त राजपत्रित अधिका-यांना सेवेत राहण्याची पात्रापात्रता विहीत निकषानुसार अजमाविण्याच्या दृष्टीने त्यांचे पुनर्विलोकन करुन नियुक्ती प्राधिका-यांना सल्ला

...२..

देण्यासाठी सामान्य प्रशासन विभागामध्ये पूर्वी तीन विशेष पुनर्विलोकन समित्या गठीत करण्यात आल्या होत्या.

२. राज्यातील राजपत्रित अधिका-यांच्या एकूण संख्येचा विचार करता पुनर्विलोकनाच्या कामाचा व्याप मोठा असल्यामुळे शासन परिपत्रक सा. प्र. वि. क्र. विपुस १०९२/प्र. क्र. २०/९२/१५, दि. १८ ऑक्टोबर, १९९३ अन्वये मंत्रालयीन विभागातील अधिकारी/ कर्मचारी यांच्या पुनर्विलोकनाचे प्राधिकार संबंधीत विभागांना देण्यात आलेले आहेत. त्या आधारे मंत्रालयीन विभागाने त्या विभागांतर्गत नियुक्त केलेल्या विभागीय पुनर्विलोकन समितीच्या शिफारशीनुसार जे अधिकारी सेवेत चालू राहण्यास निर्विवादपणे अपात्र ठरणार असतील अशा अधिका-यांचे बाबतीत विभागीय समितीने घेतलेल्या निर्णयाचा सर्वकष विचार करुन अशा प्रकरणांबाबत प्रचलित कार्यपध्दतीनुसार त्याचे पुनर्विलोकन सामान्य प्रशासन विभागाच्या विशेष पुनर्विलोकन समिती-कडून केले जाते. त्यासाठी गट अ च्या अधिका-यांसाठी विशेष पुनर्विलोकन समिती क्रमांक १ व गट ब च्या अधिका-यांसाठी विशेष पुनर्विलोकन समिती क्रमांक २ व विशेष पुनर्विलोकन समिती क्रमांक ३ अशा समित्या अस्तित्वात होत्या. या समित्यांची पुनर्रचना करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

यासंदर्भात शासनाने सदर समित्यांची पुनर्रचना करुन खालीलप्रमाणे खालील २ समित्या गठीत करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

<u>गट अ च्या अधिका-यांसाठी विपुस क्र. १</u>

१. अध्यक्ष = अपर मुख्य सचिव, गृह विभाग [श्री. पी. सुब्रहमण्यम्]
२. सदस्य = प्रधान सचिव [वने] महसूल व वन विभाग [श्री. ए. के. मागो]
३. सदस्य - प्रधान सचिव [ सेवा] , सामान्य प्रशासन विभाग [श्री. के. सी. श्रीवास्तव ]
४. स्विकृत सदस्य- संबंधीत विभागाचे सचिव,
५. सदस्य सचिव - श्री. य. मा. जोशी, उप सचिव, सा. प्र. वि. [सेवा]

<u>गट ब च्या अधिका-यांसाठी विपुस क्र. २</u>

१. अध्यक्ष = प्रधान सचिव [ महसूल ] महसूल व वन विभाग, [ श्री. अजीत वर्टी]
२. सदस्य = सचिव [ लेखा व कोषागार ] वित्त विभाग [श्री. चित्कला झुत्सी]
३. सदस्य - सचिव , विधी व न्याय, [श्रीमती प्रतिभा उमरजी]

४. स्विकृत सदस्य = संबंधीत विभागाचे सचिव,

५. सदस्य सचिव = श्री. रा. द. कासार, उप सचिव, सा.प्र.वि.

वरील दोन्ही समितीकडे सादर करण्यात येणारी पुनर्विलोकनाची प्रकरणे संबंधीत समितीच्या सदस्य सचिवामार्फत प्रधान सचिव [सेवा], सामान्य प्रशासन विभाग यांना अंकीत करून नंतर शासनाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात येतील.

गट अ च्या अधिका-यांच्या पुनर्विलोकन समितीची अभिवेदने, अभिवेदन समिती म्हणून आस्थापना मंडळ क्र. २ कडे सादर केली जातील व गट ब च्या अधिका-यांची अभिवेदने अभिवेदन समिती म्हणून विपुस क्र. १ कडे सादर करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ ध. मा. जोशी ]
शासनाचे उप सचिव.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,

मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

श्री. पी. सुब्रहमण्यम, अपर मुख्य सचिव, गृह विभाग, व अध्यक्ष,

श्री. के. सी. श्रीवास्तव, प्रधान सचिव [सेवा] सा.प्र.वि. व सदस्य,

श्री. ए. के. मागो, प्रधान सचिव [ वने] महसूल व वन विभाग, व सदस्य

श्री. अजीत वर्टी, प्रधान सचिव [ महसूल ] महसूल व वन विभाग व अध्यक्ष

श्री. चित्कला झुत्सी, सचिव [ लेखा व कोषागारे] वित्त विभाग व सदस्य,

श्रीमती प्र.म. उमरजी, सचिव, विधी व न्याय विभाग व सदस्य,

श्री. रा. द. कासार, उप सचिव, सा.प्र.वि. व सदस्य सचिव,

मंत्रालयातील सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव व सचिव,

सर्व मंत्रालयीन विभाग,

निवड नस्ती.